आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या वर्षात केंद्र पुरस्कृत आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेसाठी निधी वितरण

राज्य हिस्सा-२२१० जी ४९४

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/ प्र.क्र.०५/ कार्यासन-६**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख : १७ जुलै, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३

२) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र. प्रजयो २०२३/प्र.क्र.१७१/आरोग्य-६.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेंतर्गत समरुप राज्य हिश्श्यासाठी अनुसूचित जमाती घटकाच्या माहे एप्रिल, २०२३ ते जून, २०२३ या त्रैमासिक कालावधीकरीता विमा हप्ता खर्चासाठी रु.११५.८५१३६ लाख व माहे जुलै ते सप्टेंबर, २०२३ या त्रैमासिक कालावधीकरीता रु.७२०.००२८३ लाख असा एकूण रु.८३५.८५४१९ लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.२ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदींमधून मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या मुख्य लेखाशीर्षाखाली केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेंतर्गत अनुसूचित जमाती घटकाच्या समरुप राज्य हिश्श्याकरीता माहे एप्रिल, २०२३ ते जून, २०२३ या त्रैमासिक कालावधीकरीता विमा हप्ता खर्चासाठी रु.११५.८५१३६ लाख व माहे जुलै ते सप्टेंबर, २०२३ या त्रैमासिक कालावधीकरीता रु.७२०.००२८३ लाख असा एकूण रु.८३५.८५४१९ लाख (अक्षरी रुपये आठ कोटी पस्तीस लाख पंच्याऐंशी हजार चारशे एकोणीस फक्त) इतका निधी खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व राज्य हिस्सा | बाब | सन २०२२-२३ मधील अर्थसंकल्पीय तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| आयुष्यमान भारत - प्रधानमंत्री जन आरोग्य योजना | २२१० जी ४९४ राज्य हिस्सा (४० टक्के) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) | २०००.०१ | ८३५.८५४१९ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.८३५.८५४१९ लाख (अक्षरी रुपये आठ कोटी पस्तीस लाख पंच्याऐंशी हजार चारशे एकोणीस फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन फक्त आदिवासी लाभार्थ्यांनाच लाभ देण्याबाबत दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६९४/व्यय-१४, दि.०७.०७.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१११७५७४६८६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2023.07.18 12:11:25 +05'30'

**(किरण कि.पवार)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग